निधी वितरण -शासन घोषित किमान आधारभुत किंमत ही विहित कालावधीतील कृषि उत्पन्न बाजार समितीच्या आधारीत दरापेक्षा जास्त असल्यास त्यामधील फरकाची रक्कम बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २७१९/प्र.क्र.१३८/१ अे**
मंत्रालय विस्तार, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०००३२.
दिनांक: ३० डिसेंबर, २०१९.

**वाचा:-**

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण २७१७/ प्र.क्र.१९९/१अे, दिनांक १७.९.२०१८.
२. कृषि आयुक्तालयाचे क्रमांक :- जा.क्र.कृआ/ गुनि/१/२ एम.एस.पी./५३७/२०१८ दिनांक १३.१२.२०१८ चे पत्र.
३. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक :- पुरक १५१८/ प्र.क्र२२६/१अे, दिनांक ११.१.२०१९.
४. कृषि आयुक्तालयाचे क्रमांक :- जा.क्र.कृआ/ गुनि/१/२ एम.एस.पी./९६/२०१९ दिनांक १२.३.२०१९ रोजीचे पत्र.
५. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक :- पुरक १५१८/ प्र.क्र२२६/१अे, दिनांक १९.०३.२०१९.
६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक :- पुनर्वि-२०१८/ प्र.क्र.११२(६)/१८/२अे, दिनांक ३०.०३.२०१९.
७. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक :- पुरक १५१८/ प्र.क्र२२६/१अे, दिनांक ३०.०३.२०१९.
८. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.कृआ/गुनि/१/२/एमएसपी/२०१९/५८१५, दिनांक १८.११.२०१९
९. राज्यस्तरीय समितीच्या दि.०३.१२.२०१९ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना:-**

सन २०१७ - १८ मधील उत्पादित पिकांकरीता कृषि उत्पन्न बाजार समितीमधील दर हा किमान आधारभुत किमतीपेक्षा कमी असल्यामुळे राज्यातील बिजोत्पादन कार्यक्रमात स्थिरता येण्याच्या दृष्टीने तसेच, शेतकऱ्यांचा बिजोत्पादन कार्यक्रमातील सहभाग कायम राखण्याच्या दृष्टीने दिनांक १७ सप्टेंबर,२०१८ च्या शासन निर्णयानुसार शासन घोषित किमान आधारभुत किंमत ही विहित कालावधीतील कृषि उत्पन्न बाजार समितीच्या आधारीत दरापेक्षा जास्त असल्यास त्यामधील फरकाची रक्कम महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित(महाबीज), अकोला आणि राष्ट्रीय बियाणे महामंडळ, पुणे यांच्या बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याबाबतची नवीन योजना लागू करण्यात आलेली आहे.

सन २०१८-१९ च्या खरीप/रब्बी बिजोत्पादन घेतलेल्या शेतकऱ्यांना कृषि उत्पन्न बाजार समिती आधारीत दर व शासन घोषित किमान आधारभूत किंमत (MSP) यामधील फरकाची रक्कम देणेसाठी एकूण रू. १३०२.०३ लाख रकमेच्या अनुदानास मान्यता देण्यासाठी महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित(महाबीज), अकोला यांचा प्रस्ताव कृषि आयुक्तालय, पुणे यांचेकडून प्राप्त झालेला होता. सदर प्रस्तावास राज्यस्तरीय समितीच्या दि.०३.१२.२०१९ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता देण्यात आलेली आहे. यास अनुसरून रू.१३०२.०३ लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

खरीप व रब्बी हंगाम २०१८-१९ मध्ये उत्पादित झालेल्या बिजोत्पादक शेतकऱ्यांच्या बियाणांना कृषि उत्पन्न बाजार समिती आधारीत दर आणि शासन घोषित किमान आधारभुत किंमत यामधील फरकाची रक्कम **महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला** यांच्या बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्यासाठी लेखाशिर्ष २४०१ A९२२ (१००% राज्य योजना) अंतर्गत रू. १३०२.०३ लाख इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. या प्रित्यर्थ होणारा खर्च हा सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३-२४०१, पिक संवर्धन, १०३, बी-बियाणे,
(००)(२८) किमान आधारभुत किंमत (MSP) आणि कृषि उत्पन्न बाजार समिती आधारभूत दर
यामधील फरकाची रक्कम बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याबाबत,(१०० टक्के राज्य कार्यक्रम)
३३- अर्थसहाय्य, (२४०१ A९२२)

२. सदर फरकाची रक्कम थेट लाभ हस्तांतरणाद्वारे बिजोत्पादक शेतकऱ्यांच्या आधारलिंक बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावी. हा निधी P.L.A./बँक खात्यांमध्ये ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.४४/अर्थ ३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक ०८जुलै, २०१९ मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२२७१५२१०९३९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2019.12.30 11:32:50 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला.
५. विभागीय व्यवस्थापक, राष्ट्रीय बीज निगम, गुलटेकडी, पुणे.
६. संचालक (निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महाव्यवस्थापक (उत्पादन), महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला.
८. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सर्व संचालक/सह संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. सर्व विभागीय कृषि सह संचालक.
११. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१३. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१४. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय,मुंबई.
१५. निवडनस्ती, कार्यासन १अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.